# वस्तू

( दीर्घांक )

**- चं.प्र.देशपांडे.**

( समोर तीन बंद दारे -- वरून अर्धवर्तुळाकार आणि थोडीफार नक्षीदार. दोनतीन खुर्च्या, मोडे. नेहा ही एक कॉलेजविद्यार्थिनी -- सुमारे अठराची. ती कार धुणे - पुसणे करत आहे -- माईमिंग. तिचे वडील नुमान आत आहेत. ते आतूनच बोलतात. नेहा तिचे काम करताकरता बोलते. काही क्षणांनंतर -- )

नुमान : ( आतूनच -- ) नेहा ऽ

नेहा : ओ पपा --

नुमान : तू स्वतः कशाला धुवतपुसत बसतेस कार --

नेहा : मी सांगितलं ना तुम्हाला --

नुमान : ते तसलं नको -- माझं ऐक --

नेहा : हे बघा, आपल्या म्हणजे माझ्याही सगळ्या कामांना आपल्याला माणसं नेमता येतील -- पण मी सांगितलं ना तुम्हाला की कुठली कुठली कामं माझी मी केली तर मीच माझं आयुष्य जगले असं होईल याबद्दल नेहमी माझं कन्फ्यूजन असतं --

नुमान : मला निघायचंय थोड्या वेळात -- आता असले कन्फ्यूजनचे विषय काढू नकोस -- कन्फ्यूजन म्हटलं की मनाचा कणखरपणा जातो -- मिळमिळीतपणा येतो -- आणि माझ्या नोकरीत नाही चालत ते --

नेहा : ( वयस्कर आवाजात -- ) " कणखर आणि रिजिड राहावं लागतं मला ! मिळमिळीत आणि फ्लेक्झिबल नाही चालत ! " ( आता जणू ही स्वतः वयस्कर असल्याप्रमाणे --)
असं म्हणायचे ! आठवतंय मला !

नुमान : आपली सुखंदुःखं आपली आपण भोगली की झालं आपलं आयुष्य ! आहे काय त्यात !
( इथे समोरच्या तीन दारांतले मधले दार उघडते आणि त्यातून एखाद्या रोबोप्रमाणे शोधन बाहेर येतो. तो खालील ओळी म्हणतो -- )

शोधन : दुःख एक वस्तू.
जनावरच एक सुटू पाहणारे.
एकाच वेळी मन,
दुःख आणि त्याचा विरोध --
एक वस्त्रवत वस्तू --
माझा अभेद्य पोत.
सायंकाळ व्हावी
आणि तिच्या होण्या -- न होण्याशी
असावा आपला संबंध.
आता लौकरच होईल मुक्तता ...
अन् अंधारही दाटला
तरी दिसू नये कोणतीच शक्यता
अन् थकलेल्या रक्तबंबाळ
मनाला तरीही राहावे लागावे जागे.
... ही सर्व वस्तू.
वस्तू असते नेहमीच प्रयत्नशील
अन् नसते कधीच शांत.

दुःखाचे जनावर मन
माझ्याच शरीरात
माझे आयुष्य
सायंकाळही उलटलेली वस्तू.
( या ओळी संपल्यावर तो तसाच पाठमोरा आत जातो आणि दार बंद होते.)

नेहा : ( वयस्कर आजावाज -- ) माझे आयुष्य
सायंकाळही उलटलेली वस्तू.( हसते.)

नुमान ( त्रासिक आवाजात --) कविता ! काय हे । आधी कन्फ्यूजन ! आता कविता ! नोकरीला जाताना मनाची वाट लागते अशानं ! मला सतत फर्म आणि कठोर असायची गरज असते ! तरच समजुतदारपणाला अर्थ येतो नंतर !

नेहा : असं का ?

नुमान : तुला हजारदा सांगितलंय, आमचं प्रीपोस्टिंग ट्रेनिंग असतं तेव्हा रोज मिनिटामिनिटाला आम्हाला घाणघाण शिव्या घातल्या जातात -- सरळ प्रेमानं बोलणं वर्ज्यच ! सतत शिव्या ! हेतू हा की अपमानानं अहंकार घट्ट घट्ट व्हावा आणि मग निबर व्हावा ! घट्ट आणि निबर !

नेहा : हे काय चांगलं आहे? !

नुमान : तू सांग ना मग, व्यवहारात माणूस महत्त्वाकांक्षी असावा की गोंधळलेला आणि कवीमनाचा असावा?

नेहा : कवीमन ही मराठीतल्या किरकोळ लोकांनी -- किरकोळ म्हणजे संख्येनं नव्हे -- कुवतीनं -- तर अशा लोकांनी पसरवलेली अफवा आहे एक ! आताचे कवी हुशारही असतात -- इंजिनियरही असतात -- पैसेही मिळवतात !

नुमान : आणि हे सगळं फ्लेक्झिबल मनानं? -- माझी आता जायची वेळ झालीय -- मला त्रास नको देऊस !

नेहा : तुम्ही जर निबरपणा कमावलाय तर तुम्हाला त्रास व्हायलाच नाही पाहिजे ! निबरपणापेक्षा गोंधळाची आणि कवितेची ताकद जास्त -- असं होतंय हे ! निबरपणासाठी, आणखी प्रयत्नांची गरज आहे तुम्हाला ! आणि निबरपणा वाढणं म्हणजे जिवंतपणा कमी होणंच नाही का? त्याला चांगलं कसं म्हणता? ( पाण्याने धुणे, पुसणे, कोरडे करणे इत्यादी कामे चालू.)

नुमान : थांब जरा, काय काय घ्यायचंय बरोबर ते बघू दे मला --

नेहा : पपा, तुम्ही ना, तुमच्या कल्पनेनं ठरवूनच टाकलंय सगळं -- मला कविता का आवडत असेल याच्यात तुम्ही इंटरेस्टच घेत नाही !

नुमान : माझे आई, मी कमकुवत आहे, पण त्याची अशी मला जाणीव करून नको देऊस ! मी नोकरी कशी करणार मग ! अजून लग्न व्हायचंय तुझं !

नेहा : पैशांची थोडीच कमतरता आहे आपल्याला !

नुमान : अरे पण हे या नोकरीमुळंच ना !

नेहा : द्या आता सोडून !

नुमान : तुला काय रडवायचंय का मला कामावर जाताना ! ?

नेहा : ( वयस्कर आवाजात -- ) गंमत करायचे ते ! खरोखर रडणारे थोडेच होते ते ! पण मग खरं काय होतं ? ( इथे पुन्हा मधले दार उघडते. शोधन बाहेर येतो.)

शोधन : आकार
करणारे उद्युक्त, इच्छुक, धुंद.
कुठे केव्हा कसे व्हावे यांचे संपर्क
याला म्हणून मोकळे व्हावे नियती.

नुमान : नेहा, माझं नांव हनुमान असून आधुनिक पध्दतीनं ते नुमान झालं ! आहे माझी काही तक्रार?

नेहा : मीही कविता आठवताना नेहा कुठे असते? मी असते शोधन ! यशोधन नव्हे !

शोधन : रंग - रूप - गंध - मार्दव
पोचतात
शरीर - मनापर्यंत,
पसरतात फांद्या

जोजावतात, जवळतात
कब्ज्याच्या खात्रीत राहतात तटस्थ
किंवा होतात परक्याच
दूरस्थ.

नेहा : माझ्या सावल्यांना या सावल्यांचे लागते
सोयरसुतक
अन् आकारतात अर्थ;
होते सारे आयुष्यच
अर्थविव्हल.

नुमान हे नसते दुःख,
हा नसतो शाप,
ही नसते क्रूर नियतीही;
कारण
याखेरीजचे माझे आयुष्य
होऊच शकणार नसते
माझे आयुष्य.
संघर्षाचे उद्गम आकार
माझ्या बाहेरचे
होतात मीच.

नेहा : पपा काय हे? तुम्हीही? ( ती काम संपवून बसलेली. )

शोधन : वाट पाहतात प्रेयसी मनांत
अन् मन उपभोगते त्यांच्या वाटा.
( शोधन मागे मागे आत जातो. दार बंद होते.)

नुमान : ( आतूनच -- ) वाट लागली ! ( बाहेर येतात. ते पोलीस इन्स्पेक्टरच्या वेषात आहेत.) रोज जाताना तू मला मानवी हक्क, पशूपक्ष्यांचे हक्क, झाडाझुडपांचे हक्क यांच्याबद्दल जागरूक असणाऱ्या माणसासारखा फद्या माणूस करून टाकतेस ! टेक केअर ! जातोय मी ! आणि ' टेक केअर ! ' -- हे मी नुसतं फॉर्मल म्हणत नाही हे मी तुला अनेकदा सांगितलेलंच आहे ! खरोखरच टेक केअर ! तू माझी लाडकी मुलगी आहेस म्हणून ! तू नसलीस तर माझा निबरपणा, सम्पत्ती -- सगळं मातीमोल होईल ! (जातात.काही क्षण. परत येतात. ) च्यायला, पिस्तूलच विसरलं ! ( आत जाऊन पिस्तूल घेऊन, लटकवत येतात.) बाईकवर टांग टाकताना आलं लक्षात ! नशीब ! नाही तर वाट लागली असती ! (जातात.)

नेहा : वाट पाहतात प्रेयसी मनांत
अन् मन उपभोगते त्यांच्या वाटा.
-- छान ! पपांना एखादी प्रेयसी असेल? ...मी तर आहेच -- जाननची प्रेयसी ! माझा जानन ! गजानन मधला ग उडवल्यावर किती चिडला होता ! मग झाला जानन ! ( हसते.) कविता पाहिजेच ! नाहीतर सगळंच मातीमोल होईल ! कविता पाहिजेच !( वयस्कर आवाजात --)का म्हणून मला आवडायची कविता?आता कुठे काय वाचते मी? काय बिघडलंय? असं काही होईल माझं असं खरंच वाटलं नसतं ! कविता ही कायम महत्त्वाचीच असते -- असंच वाटायचं !... तसं पाहिलं तर पपांचं आयुष्य -- वाईटच गेलं ! ... वाटायचं ... पैसे आहेत ना, मग असं करू -- माझी सुखं मी भोगते आणि माझी दुःखं भोगायला माणसं नेमू ! पपा म्हणाले, काव्यकल्पना ! माझ्याही आलं लक्षात -- असं कुठाय -- की प्युअर सुख चालू मग प्युअर दुःख चालू ! आणि समजा करता आलंच असं -- तर माझं आयुष्य जगल्याचं समाधान मला मिळेल? आणि याही प्रश्नावर लगेच माझ्या लक्षात आलं होतं की दुःखाचे गोडवे गाणारा हा माझा प्रश्न -- दुःखाच्या गोडगोंडस कविता लिहून टाळ्या मिळवणाऱ्या कवींच्या दुःखाइतकाच फालतू आहे !

दुःखाच्या असल्या प्रकारांवर करमणूक करून घेणारे हजारो, लाखो लोक जगात असल्यामुळं मला फारसं लाजायचं कारण नव्हतं एवढंच ! ... पण मीही तशी सुदैवीच ! दुःखाची करमणूक आवडावी इतपत माझंही चांगलंच गेलंय की आयुष्य ! ( आता दोन दारे उघडतात. डावीकडचे आणि मधले. मधल्या दारातून शोधन येतो आणि डावीकडच्या दारातून दुंबर. दुंबरच्या दोन हातांत मोठा धोंडा आहे. तो क्रोधाविष्ट आहे. तो नेहाकडे रागाने पाहतो आहे.) पपा गेल्या काही दिवसांत तुम्ही कुणाला मारलंबिरलं होतं का हो?

नुमान : ( आतूनच -- ) तो माझ्या कामाचा भागच असतो बेटा ! ( नेहा तंद्रीत.)

शोधन : नेमकी कोणती ही रात्र,
कोणत्या मानवी घटनांनी मावळलेला हा दिवस,
आमची आयुष्यें नियंत्रिणारी नेतृत्वे
कोणती वळणे देऊन गेली असतील क्षणांना,
वगैरे कित्येक गोष्टी अज्ञात.
अन् तेवढ्यापुरतीच ही रात्र संदर्भहीन.
की याहूनही अज्ञात असे आहे या रात्रीला
एखादे संपूर्ण निरर्थक
अन् कधीच ज्ञात होऊ शकणार नाही असे
निखालस अस्तित्व?

दुंबर : लोकांना वाटतं हिंदी पिक्चर खोटे असतात ! उलट तेच खरे असतात ! कुणाचा तरी सूड घ्यायची गरज वाटत नाही असं कोण असतं?

शोधन : माझ्या बेसुमार दुःखाने बरबटलेली ही रात्र
हे हळूहळू प्रगटलेले चांदणे, या अतर्क्य इमारती
अन् निद्रिस्त माणसे
की हे नुसतेच एक असंबध्द काहूर?

दुंबर : कसलं आलंय बेसुमार दुःख तिला? मग का वाचतेय ती ही कविता?

नेहा : माझं दुःख पोचत नाहीय तिथपर्यंत...पण...

शोधन : या साऱ्याच गोष्टी आहेत माझ्या शरीरात,
साऱ्यांचेच ताण साहत आहेत माझ्या नसा
की नुसतीच माझ्या दुःखी मनाची
वेड्यावाकड्या रेषांची ही कल्पनशा?

नेहा : बाप रे !

शोधन : या रात्रीचे नेमकेपण कळल्याने संपूर्ण
होणार आहे का माझी सुटका
या रात्रीतून ?

नेहा : बाप रे ! ( शोधन मागे जातो. नंतर दार बंद होते. आता दुंबर दोन्ही हातांत धोंडा वर धरून पुढे येतो. त्याला तो धोंडा नेहाच्या डोक्यात घालायचा आहे. तो पुढे येतो. नेहा पाहते. ती महत्त्व देत नाही. पुन्हा तंद्रीत.)
या रात्रीचे नेमकेपण कळल्याने संपूर्ण
होणार आहे का माझी सुटका
या रात्रीतून? ( ती गढलेली. दुंबर जवळ येतो. धोंडा तिच्या डोक्यावर न टाकता तिच्या बाजूला टाकतो. झटकन् निघून जातो. त्याच दारातून. दार बंद होते.)
कवितेमुळंच मी वाचले असं तर घडलं नसेल? ( वयस्कर आवाजात --) कवितेमुळंच मी वाचले असं तर घडलं नसेल? ( काही क्षण शांतता...)
कुठल्याही धर्माच्या सणाची वर्गणी मागायला कुणी आलं तर पपा मनातनं धुमसायचे ! वर्गणी द्यायचे पण

ते लोक गेल्यावर घाण शिव्या द्यायचे त्यांना ! मला त्या  शिव्या ऐकू येतायत हेही विसरायचे ते ! धार्मिक सण आले की बंदोबस्ताचा फार ताण यायचा त्यांच्यावर ! ( वयस्कर आवाजात --) तेव्हापासून मलाही धार्मिक सणांचं आकर्षण नाहीच ! माझ्या पपांना ज्याचा त्रास होतो ते मला का आवडावं !? आणि जी गोष्ट हिंसेची भीती वाढवते ती चांगली असेलच कशी ? ( काही क्षणांनी ... ) हे प्रश्न मलाच दिसत असतील फक्त ? ( काही क्षणांनी ... ) पपा तुम्ही काय करताय?

नुमान : ( आतूनच -- ) मी ड्युटीवर जायच्या तयारीत आहे बेटा -- निघेनच मी आता -- ( क्षणभराने नुमान जिथून गेले होते तिथूनच जाननला ढकलत घेऊन येतात.) हा घे तुझा प्रियकर ! माझ्या मते हा एक क्रिमिनल आहे ! तुझ्या मते कवी ! मी याला अजिबात मारलंबिरलेलं नाही, पण, अर्थातच माझं लक्ष असणार आहे त्याच्यावर ! तू सुध्दा पुरतेपणानं समजून घे याला ! सिनेमा हीसुध्दा जर एक कला आहे तर मग त्याचा आणि अंडरवर्ल्डचा एवढा घनिष्ठ संबंध कशाला? आणि हा तुझा कवी कशामुळं वेगळा ठरतो ते शोधून काढ! क्राईम आवडणं हे प्रेमाचं कारण असता कामा नये तुझ्या ! म्हणजे तुझ्या, त्याच्यावरच्या प्रेमाचं ! कळलं?! ( आलेल्या मार्गानेच जातात. जाननच्या हातात एक पुस्तक आहे. तो जाऊन एका खुर्चीवर पाठमोरा बसतो.)

जानन : उगाचच्या उगाच ! मी? क्रिमिनल? ( मान झटकतो आणि मग वाचू लागतो...)

नेहा : पपा, माझी कार झालीय धुवून. मीही निघणारच आहे थोड्या वेळानं !

नुमान : हो, बेटा, मी तर निघालोच ! सगळ्या वस्तू घेतल्या का ते एकदा तपासतो आणि निघतो !

नेहा : ( आता जाननला उद्देशून -- ) मी काही तुला क्रिमिनल म्हटलेलं नाही -- तुझ्याच कवितेनं मला अलीकडं वेडं केलेलं आहे असं नाही म्हणत मी -- कारण वेडं करायला ती काही करमणूकप्रधान किंवा स्वप्नील कविता नाही ! पण माझे पपा तुला क्रिमिनल म्हणाले ही गोष्ट -- म्हणजे ... जाऊं दे ! मीच तुझा छडा लावते -- म्हणजे तुझ्या गुन्ह्याचा -- असलाच काही गुन्हा तर !  ( जानन पोझिशन बदलून वाचत राहतो...) मला एकच सांग, तुझ्या कवितालेखनातला सगळ्यात महत्त्वाचा भाग कोणता? लिहिताना तुला होणारा आनंद? तुझ्या कवितेचा तुझ्या वाचकाशी होणारा संपर्क? की तुझ्यावर टीकालेख येणं? तुझ्यावर विशेषांक निघणं? पारितोषिक मिळणं? मग काही दिवस अभिनंदनाचा वर्षाव होत राहणं? काय? यांतलं महत्त्वाचं काय?( काही क्षण ....) एका समीक्षकाला तुझ्या कविता आवडायच्या, तर, त्यानं तुझ्यावर लिहिलं पाहिजे म्हणून तू त्याच्या मागे लकडा लावला होतास आणि त्याच्या घरी तू चकरा मारायचास हे मला माहीत आहे... पारितोषिक मिळाल्यावर, आपण खरोखरच सर्वश्रेष्ठ आहोत हे तुझं स्वतःबद्दलचं मत अधिक पक्कं होताना मी पाहिलेलं आहे... ( थांबते, त्याच्या प्रतिसादाची वाट पाहते --) म्हणजे तुझं काहीच म्हणणं नाही याच्यावर? मग, याचे ज्याला जे वाटतील ते अर्थ निघाले तर चालतील? की तुझ्या कृतींबद्दल तुलाच क्लॅरिटी नाही असं समजायचं? बरं, ते जाऊं दे, तू सर्वश्रेष्ठ ठरणं हे तुला महत्त्वाचं वाटतं की नाही ते तरी सांग !...तुझ्यापेक्षा कमी दर्जाच्या माणसाला जेव्हा युगपुरुष म्हणून मान्य करण्यात येतं तेव्हा तुला काय वाटतं ते सांग, चल ! किंवा, तू जेव्हा दुसऱ्या कवींवर बोलतोस तेव्हा तू त्यांच्यावर भाषेबाबत किंवा तांत्रिक आक्षेप घेतोस -- त्यांच्या आशयाबाबत आक्षेप घ्यायची कुवत दाखवत नाहीस -- असं म्हटलं तर? ... की आशय, भाषा, तंत्र -- सगळं एकत्रच असतं असं म्हणून तू या आक्षेपातून सुटका करून घेशील? बरं, तेही जाऊं दे, चल ! तुझं श्रेष्ठत्व कशात आहे तेवढंच बोल, चल ! ( जानन जरा घसरून, अधिक आरामात, पाय पसरून बसतो -- वाचन चालू ... ) जानन, हे माझं स्वगत चाललेलं नाही आहे -- तुझ्याशी संवाद चाललाय हा -- ( इथे समोरचे मधले दार उघडते. शोधन बाहेर येतो.)

शोधन : वस्तूचा खरेपणा अनिवार
वस्तूला.
मनाचे सारेच व्यवहार
मनाला. ( मागे जातो. दार बंद होते.)

नेहा : या ओळी लिहिणारा तू ! तू कधी शहाणा असतोस आणि कधी वेडा -- असं तर नाही? आणि तू खूप लोकप्रिय -- खूप मोठा कधी होणार? तुझ्यावर प्रेम करणारा एखादा माणूस तुला म्हणतो की तुम्ही लिहीत राहा, तुम्हीही विंदा व्हाल-- तेव्हा तू विध्द होतोस आणि असं म्हणणाऱ्याला विचारतोस की गदिमांना ज्ञानपीठ का मिळालं नाही याचा विचार करा आणि उत्तर सापडल्यावर मला सांगा ! कधी

गदिमा, कधी सुरेश भट, कधी पाडगावकर आणि कधीकधी तर खेबुडकर -- असे पेच तू त्यांना घालतोस ! जरा थोडे अधिक शहाणे असले तर नेमाडे, चित्रे, कोलटकर असे पेच घालतोस ! बरेचसे नामोहरम होतात, बरेचसे अवांतर बडबड करत राहतात ! तुझं काम होतं ! पण तुला काय म्हणायचंय ? ते म्हण ना स्पष्टपणे ! ... तुझी कविता मुळातल्या प्रश्नांना हात घालते रे ... मग तू असल्या फंदात का पडतोस? तू लोकप्रिय का होऊ शकत नाहीस हे तुला माहीत नाही? तरीही लोकप्रियतेचे मार्ग मान्य असल्यासारखा का वागतोस? देशभक्ती किंवा गरीबांची कणव किंवा अन्यायग्रस्तांची बाजू घेणं असं काही प्रदर्शन असल्याशिवाय ज्ञानपीठ मिळत नसतं -- हे तू का सांगत बसतोस? आणि 'प्रदर्शन' हा तुझा शब्द झाला -- कणव खरी नसते? आणि जर त्या गोष्टी खऱ्याही असू शकत असतील तर त्या महत्त्वाच्या नाहीत? देशभक्ती महत्त्वाची नाही? काही क्रांतिकारकांनी मृत्यू पत्करून मिळवलेल्या स्वातंत्र्याच्या वातावरणाचा फायदा घेऊन तू त्यांच्याच विरुध्द कसा काय बोलू शकशील? आणि ज्याला सर्वश्रेष्ठ होण्यात इंटरेस्ट आहे तो देशभक्ती कशी काय कमी दर्जाची लेखू शकेल? ...तुझ्या कवितेपेक्षा जरा जास्तच अर्थपूर्ण समजा मी बोलले तर चालेल ना? ..यावर तू काय म्हणतोस ते मला माहीत आहे -- महत्वाकांक्षा खरी असते -- सूडभावना खरीच असते -- जातीचा, धर्माचा अभिमानही खराच असतो ! नुसतं खरं असून उपयोग काय? होय की नाही? मला उलट तुझीच कणव येते .. तुला पडणाऱ्या खऱ्या प्रश्नांत लोक इंटरेस्ट घेत नाहीत म्हणून तू लोकांना महत्त्वाच्या वाटणाऱ्या गोष्टींना बळी पडतोस ! ... पटतंय का? ... तुला हिंदी फिल्मचं ग्लॅमरही हवंय का? अमिताभसारखा तुझा पुतळा बसवायचाय इंग्लंडच्या म्युझियममध्ये? बरं ते जाऊं दे -- कलेच्या क्षेत्रात अकल्पनीय उंची गाठणे हा निकष घेऊन अमिताभ आणि आरती प्रभू यांची कशी तुलना होऊ शकेल? कोण अधिक उंच? ... बरं, जरा थोडं सैलसर बोलू का ? अभिताभनं भारतातल्या पिढ्या घडवल्या आणि पुलंनी महाराष्ट्रातल्या पिढ्या घडवल्या ! -- हे वाक्य घेऊ ! यात पुल जरा अमिताभपेक्षा लहान ठरतात का? आणि एकूणातच महाराष्ट्र मागेच पडत चाललेला दिसतो आणि बाकीच्या भारतानं उलट महाराष्ट्रही काबीज करत नेला आहे असं दिसतं -- तर कोण श्रेष्ठ? अमिताभ की पुल? ( जानन पुस्तक मांडीवर ठेवतो आणि अधिकच रिलॅक्सड् बसतो. ) तुझं लक्ष आहे नं?... अभिताभनं काय दगडं इथल्या पिढ्या घडवल्या? कायदा हातात घेऊन इथं कितपत दुष्टांचं निर्दालन झालं? दुष्टाला दुष्टही म्हणायची सोय नाही इथं ! उलट अमिताभनं इथल्या माणसांना पंक्चर केलं ! दुष्टाचा पाडाव होतो या खोटया धुंदीत ठेवलं त्यानं त्यांना ! नुसता स्वतः यशस्वी होत बसला ! त्याची कुवत असामान्य ! पण कसली कुवत ? कशासाठी वापरली? चिनी अंकशास्त्राप्रमाणं अमिताभच्या जन्मतारखेवरून त्याच्या जगण्याचा अर्थ असा दिसतो की पैशाचा अतिरेकी लोभी आणि पैसा हेच सर्वस्व मानणारा ! ते चिनी शास्त्र हे शास्त्र आहे की नाही हा प्रश्नही विचाराच पण त्यावरून येणारा निष्कर्ष बरोबर की चूक हेही विचारायला नको? ..ऊफ् । देवा ! मी 'देवा !' म्हटलं म्हणजे मला 'देव ' ही काय चीज आहे हे माहीत आहे असं नाही ! एक आपली बोलण्यातली सवय ! ही सवयही टाळली जावी अशी दुसऱ्या कुठल्या विचारसरणीची सवय मला नाही एवढाच त्याचा अर्थ ! त्यामुळे, मी तुला हेच विचारतेय की तुझी कविता हा तुझ्या सवयीचा परिणाम आहे का ? फार तर वेगळी असेल तुझी सवय ! सगळ्यांचीच मनं ही वेगवेगळीच असतात, तुझं जरा जास्तच वेगळं असं समजू ! खूष ? ! त्यामुळंच तर तू एक सर्जक माणूस ठरत नाहीस? बहुसंख्य लोकांच्या सवयींपेक्षा वेगळ्याच सवयींनी युक्त माणूस म्हणजेच तर सर्जक माणूस नव्हे? मला तर तुमच्या प्रतिमा, भाषा, शब्दसम्पत्ती, तंत्रावरची पकड -- सगळंच आदरणीय वाटतं, पण, शिवाय हे प्रश्नही पडतात ! करू काय ! तू झोपलायस की काय? तू माणसाच्या एकूण जगण्याला महत्त्व देणारा माणूस असूनही या सगळ्या प्रश्नांच्या कचाट्यात तू सापडतोस -- असं जर मी म्हटलं तर तू काय म्हणशील?

जानन : तुझं बरोबर आहे, पण माझं तुझ्यावर प्रेम आहे -- हीच पार्श्वभूमी ठेव ... ( पुन्हा वाचन सुरू करतो ...)

नेहा : तुझं एक उत्तर मला माहीत आहे -- मागणी तसा पुरवठा करणारे ते व्यावसायिक आणि स्वतःच्या जगण्यातून लिहिणारे ते सर्जक ! ( काही क्षणांनी -- ) खूप वाचावं लागतं? खूप कष्ट करावे लागतात? खूप कवींवर मतं देता यावी लागतात? राजकारण, अर्थकारण समजावं लागतं? ज्या गोष्टीत आर्थिक फायदा नाही ती उपयोगी का समजावी? -- या प्रश्नाचं उत्तर देता आलं नाही तर? तर काय? ( वयस्कर आवाजात -- ) तू म्हणायचास या सगळ्या प्रश्नांनी तुला त्रास होतो -- तुझा छळच झाल्यासारखं तुला वाटतं ! -- तुला असल्या वैचारिक कसरतींची गरज नाही -- तू एक उत्स्फूर्ततेच्या

मार्गानं जाणारा कवी आहेस -- तर्कापेक्षा तुला भावनाच महत्त्वाची वाटते -- आणि कलेत भावनाच महत्त्वाची असते ! -- याला तू अमिताभचंच उदाहरण द्यायचास -- त्याच्या अभिनयातल्या भावनिक तीव्रतेमुळंच तर त्याच्या पिक्चरमधले तद्दन खोटे प्रसंगही खरे वाटतात ! जसे राग, लोभ तशी तुझी कविता असं तू म्हणायचास ! तुला काही गंभीर प्रश्न पडायचे पण तरीही तू त्या उत्स्फूर्ततेच्या मार्गाचाच आधार पसंत करायचास ! ही काय भानगड होती रे? ही कसली टाळाटाळ होती? तू कशाला घाबरत होतास? तुझ्या कवितेतलं नावीन्य तुझ्या वाचकांनी त्यांच्या सवयींमध्ये बसवून टाकायला तुझी परवानगी होती -- असाच याचा अर्थ ना? आणि तरीही तुला लोकप्रियता कमीच लाभली ! काय असावी याची कारणं ? तुझ्या बोलण्यात मधेच वर येणारा तुझा फटकळपणा? की -- दुसऱ्यांनाही आपण चांगलं म्हणावं, आपणही त्यांच्याकडून चांगलं म्हणून घ्यावं -- हे तुला जमलं नाही? तू श्रेष्ठ असल्याची तुझी भावना तुला दडवून ठेवता आली नाही, हेच खरं ! त्यामुळं श्रेष्ठांच्या यादीतनं लोकांनी तुला वगळूनच टाकलं ! ही नियती ! ( तो पुस्तक ठेवतो. डोक्यापाठीमागे दोन्ही हात पकडून बसून राहतो. नेहा आता तिच्या नॉर्मल आवाजात बोलते --) कविता चांगल्याच आहेत तुझ्या पण तुला माणसं सांभाळणं जमलं नाही. तू तुटकपणे वागणार, ज्याच्यात्याच्या मर्यादा सांगणार आणि लोकांनी तरीही तुझा उदोउदो करावा -- हे कसं घडणार? लाख तुझ्या कविता चांगल्या असतील पण त्यांच्यावर भाषणं, चर्चा करायला आणि त्या ऐकायला लोक जमायला हवेत ना ! आता तर, एके काळचे तुझे मित्रही तुझ्याबद्दल कुठे काही लिहीत-बोलत नाहीत ! तुझा उल्लेखही करत नाहीत ! तुझं म्हणणं काय तर समीक्षा ही संबंधित कलावंत कसा रॅपो ठेवतो याच्यावर अवलंबून असणं चुकीचं आहे ! मराठीत लिहितोयस ना तू ! मग ही असली अपेक्षा कशी चालेल? ! इथे सगळ्यांनी आपापले ग्रुप्स केले आणि एकमेकांच्या टिमक्या वाजवायची सोय केली ! त्यातून मग पॉवर पॉलिटिक्सप्रमाणे एकदोन एकदोन ग्रुप्समध्ये समझोते करून आणखी अधिक गाजणंही काहींना जमलं ! हे वाईट आहे असं म्हणू नकोस -- तूही काही काळ हे करून पाहिलेलं आहेस ! थोडंफार जमलंही तुला ते ! पण यात आपलं श्रेष्ठत्व सोडून वागावं लागतं हे तुझ्या लक्षात आलं ! शिवाय आणखीही एक प्रॉब्लेम होता -- तू ज्या टोळीत गेलास ते सगळे समाजवादी टाईप लोक होते ! कविता प्युअर सुखदुःखाच्या रचना पाहणाऱ्या -- चिंतनशील प्रकारच्या लिहायच्या आणि त्यांचा गवगवा समाजवाद्यांकडून करून घ्यायचा ! हेही विचित्रच होत होतं ! आणि ओंगळही ! बरं तुझ्याच प्रकारचं लिहिण्याऱ्यांची अशी एखादी प्रभावी टोळी नव्हती की बाबा तिच्यात सामील व्हावं ! आता तू असं म्हणायला लागला आहेस की समकालीन लोक एकमेकांना न्याय देऊ शकत नाहीत ! हॉपकिन्स सारखा कवी किंवा मेटॅफिजिकल कवी कसे जगाला त्यांच्या मृत्यूनंतर समजले किंवा खरे समजले ! -- हे हल्ली सारखं तुझ्या बोलण्यात असतं ! तू त्या टोळीत सामील झाला होतास तेव्हा मात्र तुझी मतं वेगळी होती ! माझ्या नंतरच्या काळात माझं लेखन लोकांपर्यंत नीट पोचणं आणि तसली आशा बाळगणं मला नको आहे -- मी आज लिहितो आहे ना, मग आज आणि आत्ताच काय ते घडायला हवं ! आणि काय ते घडायला हवं म्हणताना तुझ्या मनात काय होतं ते मी सांगते -- सगळ्यांनी तुला युगपुरुष म्हणून मान्य करणं -- तसं जाहीर करणं -- आणि तेच नेहमी बोलत राहणं ! ( काही क्षण ...) तुझ्यामाझ्या वयात अंतर जरा जास्त आहे पण असे मोठेमोठे गोंधळ डोक्यात घेऊन तू जगतोस म्हणूनच मला आवडतोस ! पपा तुला क्रिमिनल म्हणतात -- खरंही आहे ते ! तुझ्यात इंटेग्रिटी नाही ! उत्तम कविता लिहिणं आणि तिचा वाचकांशी संपर्क होणं याव्यतिरिक्त असल्या बाहेरच्या गोष्टींचा भिकारडेपणा का असावा तुझ्यात? पपांना तर वाटतं की तू माझाही गैरफायदा घेतोयस ! मी म्हणजे निव्वळ तुझा करमणुकीचा विषय आहे ! इतके गोंधळ ज्याला पेलावे लागतात त्याला करमणूक हवीच ! आणि मला तर इतके गोंधळ पेलणाऱ्याचं आकर्षण वाटतंच ! त्यामुळं ही सगळी देवाणघेवाण आहे असं पपा म्हणतात ! प्रेमबीम काही नाही असं त्यांचं म्हणणं ! ( इथे नुमान प्रवेश करतात.)

नुमान : काय म्हणतायत प्रेमवीर? एक झापड मारली की सगळं उतरून जाईल प्रेमबीम !

नेहा : तो म्हणतोय की त्याच्या कविता सगळ्या माणसांसाठी असतात, त्यामुळं त्या समाजवाद्यांनाही आवडू शकतात ! आणि दुसरं म्हणजे त्याचं म्हणणं असं की शोषितांचे लढे उभारणं, त्यांच्यासाठी काम करणं -- याच्या तो विरोधात नाही ! खरं तर तो मुद्दाम असं कशाच्याच विरोधात नाही असं म्हणतोय तो ! त्यामुळं त्यांच्याकडूनही एखादं बक्षीस मिळालं तर त्याचा अर्थ तो त्यांच्या विचारांचा आहे असा नाही !

नुमान : जानन नाही का नाव याचं ! याचं सगळं रेकॉर्ड मला माहीत आहे ! ( जाननच्या जवळ येऊन उभे.

त्याच्या डोक्याचे केस धरतात.) हुशारी नकोय -- कळलं ना ! खून करणारे परवडले पण लोकांच्या डोक्यांचा गोंधळ वाढवून वेडे आणि खुनी निर्माण करणारे हे लोक ! चांगलं ओळखतो मी ! ( केस सोडून देतात.)

जानन : अहो पण क्रिमिनल्स तयार होत राहणं तर महत्त्वाचंच आहे ना, त्यांच्यावर तर अवलंबून असते तुमची नोकरी !

नुमान : अरे हो, हो ! त्यांच्यावर आम्ही अवलंबून असलो तरी त्यांना खलास करणं हेच आमचं काम आहे ! ते जाऊं दे ! -- तू क्रिमिनल असल्याचं केलंस ना कबूल शेवटी ! थर्ड डिग्री न वापरता ! ( इथे समोरचा मधला दरवाजा उघडतो पण शोधन येत नाही. नेहा क्षणभर वाट पाहते. मग -- )

नेहा : दुःख ही केवळ एक वस्तू,
एखाद्या व्यक्तीची एक रचना,
कदाचित त्या व्यक्तीच्या आयुष्याचे मोल मागणारी
पण राहणारी परकीच
दुसऱ्या व्यक्तीला.
होऊ शकणार नाही कधीच
तीच रचना दुसऱ्या कोणाचीच.
या रात्रीची ही रचना
ही माझी रचना ... मीच ...

( इथे हे दृश्य संपते. पुढचे दृश्य सुरू होते तेव्हा नेहा उजव्या हाताला कॉम्प्यूटरवर काही काम करत बसलेली आहं. तिचा चेहरा उल्हासित दिसतो आहे. जानन आरशात बघून भांग पाडतो आहे. दुंबर विचारात बसलेला. काही क्षणांनी ...)

जानन : ( स्वतःशी -- ) आपल्याला वाटतं तिला कसलं असणार आहे दुःख ? आई नसण्याचं दुःख, वडिलांची नोकरी न आवडण्याचं दुःख आणि एकटेपणाचं दुःख ! आणि हे सगळं सतत एकत्रितपणे -- कशाचं किती आहे हे न कळता असणं !

दुंबर : ( स्वतःशी -- ) अशा मनःस्थितीमुळं काहीजणांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा आक्रमकपणा येतो, पण हिच्या चेहऱ्यावर एक निरुपद्रवीपणा, प्रतिकारहीनता आलेली आहे ! त्यामुळंच तो धोंडा मी बाजूला टाकला असावा ! आणि मुळात मी तो धोंडा उचललाच कशाला होता? मला तिला ठार थोडंच मारायचं होतं ? नुसती इजा करायची होती -- एक सूड म्हणून ! तिच्या पपांनी माझ्या भावाला निष्कारण मारल्याबद्दल ! एखाद्याला संशयावरून पकडणं आणि मारणं हा त्यांच्या कामाचा भागही असेल पण मला संताप आलेला होता ! पण मग माझ्या हातून एक खरोखरचाच गुन्हा घडला असता ! कदाचित मला तिला नुसतंच घाबरावायचं असेल ! पण तिच्या चेहऱ्यावर जर आक्रमकपणा असता तर माझा हेतू नसतानाही माझ्या हातून घडलाही असता गुन्हा ! पण ती प्रतिकारहीनता पाहून मी चपापलो ! आणि धोंडा बाजूला टाकला ! -- असंच -- बहुतेक !

नेहा : पपा, तुम्हाला चहाबिहा हवाय का करून? आज रिया आलेली नाही म्हणून विचारतेय --

नुमान : ( आतूनच -- ) नको बेटा -- निघतोच आहे मी आता -- आणि दिवसभर सारखा चालूच असतो चहा --

नेहा : चहा आणि सिगारेट पपा ! वाईट आहे हे !

नुमान : मलाही कळतं ते ! बघू !

नेहा : पण पपा, तुम्ही निष्कारण कुणाला मारत नका जाऊ !

नुमान : कसं शक्य आहे ते ? सत्य शोधण्यासाठी हिंसा लागणारच ! आणि आपल्याला यशस्वी व्हायचं असलं तरीही त्यासाठी हिंसा लागणारच !

नेहा : पपा, तुमच्या या मनःस्थितीमुळंच तुम्हाला सिगारेटचं व्यसन लागलंय !

नुमान : आणि तुला कवितेचं कशामुळे लागलंय? ( नेहाचे डोळे पाणावतात. ती काही बोलत नाही.) सॉरी हं बेटा, काहीतरीच बोलून गेलो मी ! फरगेट इट ! माझ्या स्वभावातच एक मग्रुरी आलेली आहे ! वस्तुतः तुझ्याशी बोलताना मी खूप काळजी घेतो ! पण तरीही ...सॉरी हं बेटा ! ...

नेहा : ( मनःस्थिती लपवत --) एवढं काही नाही पपा !

जानन : कवितेचा उपयोग काय असं विचारतात भडवे ! जणू काही नुसतेच व्यवहार आणि कृती चालू असतात

जगात ! मनःस्थिती नसतातच ! दुःख ही नुसतीच एक फॅक्ट ! पण वेदनामय असते ना ती फॅक्ट?! तेव्हा नाही विचारत, वेदनेचा उपयोग काय म्हणून ! वेदनेचाही उपयोग पैसा आणि यश मिळवण्यासाठी करता आला पाहिजे ! आणि वेदनेचा उपयोग नाही कसा? एक छानसा बधीरपणा नाही देत वेदना? व्यवहारात उपयोगी पडणारा बधीरपणा ! ?

नेहा : ( कॉम्प्यूटरवरचे लक्ष न काढता --) जानन, तुझं तेच चाललंय का ते बघ रे बाबा ! आपल्याकडे कवितेवर पैसा मिळणं शक्य नाही पण निदान यश तरी ! ( इथे नुमान घाईघाईने प्रवेश करतात. खिसे, पिस्तूल इत्यादी चाचपत चाचपत डोक्याकडे हात जातो. कॅप विसरलीय हे लक्षात येते. आत जाऊन कॅप घेऊन येतात. कॅप घालत बाहेर जातात.)

नुमान : निघतोय गं मी नेहा ! ( जातात.)

नेहा : हो पपा !

दुंबर : हिंदी पिक्चरची कला कशी पैसा आणि यश दोन्ही मिळवून देते ! चांगलं दिलं की घेतात लोक ! येतात ! आणि भरभरून देतातही ! सूडाची भावना निर्माण होणारं आपलं जे मन असतं त्याला चांगलं वाटलं पाहिजे ! ते महत्त्वाचं असतं ! त्या मनाला खूष करणं, त्याची करमणूक करणं, त्यासाठी अधिकाधिक श्रीमंती, उंची मार्ग वापरणं आणि त्यातून अमाप पैसा, यश, ग्लॅमर मिळवायचे हेतू बाळगणं हे क्रिमिनल नाही तर काय असणार ! अंडरवर्ल्ड आणि हे एकत्र असणारच ! ( इथे मधला दरवाजा उघडतो. शोधन येतो.)

शोधन : संपूर्ण दुःखात तसूभरही फरक न करू शकणारा मी
करतोय माझे रक्षण
अन् होतोय हवालदिल.
... या माझ्या अस्तित्वाच्या सावल्या
या रात्रीवर कुठवर ठसतील?
... दिसू लागला आहे आता मला चंद्र
काही क्षण
विचारच स्थगित झालेली ही वस्तू ! ( जातो. दार बंद होते.)

दुंबर : वाट लागली ! चंद्राला वस्तू म्हणतो !

नेहा : एखाद्या खुनी माणसाच्या हिंस्रपणाने
आयुष्य स्वीकारत राहिलेला -- राहिलेली मी !
... उलटलेल्या सायंकाळचे भयही दुःखात समाविष्ट झालेली वस्तू
ही रात्र !

दुंबर : अवघड आहे ! इथून जावं हे बरं ! ( ज्या दाराने आला त्याच दाराने जातो.)

जानन : बरं, तू काय करणार आहेस आता?

नेहा : काही नाही.

जानन : तुझे पपा आता कधी येतील?

नेहा : ( हाक मारत -- ) पपा ऽ

नुमान : आहे बेटा मी -- निघतोच आहे --

जानन : ( स्वतःशीच -- ) च्यायला !

नेहा : बरं, ठीक आहे, मी माझ्या टिकलीला बिस्किटं भरवत भरवत बोलते तुझ्याशी -- टिकली ऽ ( ती येते. नेहा बिस्किटे घेऊन येते. भरवत राहते.)

जानन : आता आपण कधीकधी हॉटेलात जातो, तुला माहिती आहे, ऑर्डर्स कधी, कशाच्या द्याव्यात, आधी काय, मग काय, कुठले पदार्थ निवडावे यांतलं मला काहीही कळत नाही, ते तुलाच बघावं लागतं ! चवींच्या मागं फार पळतच नाही मी ! कुठे काय चांगलं मिळतं हेही मी लक्षात ठेवत बसत नाही. सटरफटर खायचं असेल तर माझे दोनचार ठरलेले पदार्थ असतात, आणि जेवणाची वेळ असेल तर राईसप्लेट ! आता हा काय दोष समजशील का तू? ! ( ती खळखळून हसते. तो बघतो. ती टिकलीमुळे हसली आहे हे त्याच्या नंतर लक्षात येते.)

नेहा : हिच्या कपाळावर हा टिकलीसारखा काळा रंग आहे ना, म्हणून --

जानन : ते आलं लक्षात ! कपडे, पादत्राणं, पेन्स, रुमाल, पिशव्या या सगळ्या बाबतीत माझं असंच आहे. त्यांत चोखंदळपणा करत, त्यांतल्या बारकाव्यांवर चर्चा करत मी वेळ घालवत नाही. त्यापेक्षा वाचन, चिंतन मला जास्त महत्त्वाचं वाटत.

नेहा : त्याशिवाय अशी कविता शक्यच नाही ! एऽ चूप ! ( -- हे टिकलीला. )

जानन : तर आता हाही एक क्राईम -- सामाजिक गुन्हा ठरवला एकानं, बोल आता ! ... तुला उत्सुकता आहे का? ... त्या टिकलीला हाकल ना आता बाहेर ! मी च्यायला इकडे --

नेहा : झालंच आहे तिचं -- चाललीच आहे ती -- पण तिला असं हिडिसफिडिस केलेलं आवडत नाही हं मला ! -- तिलाही आणि मलाही ! --

जानन : बरं, सॉरी !

नेहा : बाय, टिकली ! ( ती जाते. नेहा सस्मित.)

जानन : एकदा मी आणि माझा एक समाजवादी मित्र एका बारमध्ये बसलेले असताना, आमचं बोलणं ऐकून एकजण उठून आमच्याकडे आला, म्हणाला, ऐकतोय मी तुमचं, जरा बोलू का? आता ती जागाच मैत्रीपूर्ण वातावरणाची असते ! त्याला स्थानमाहात्म्य म्हण हवं तर ! म्हटलं, बोला ! तर, त्याचं म्हणणं, तुम्ही, म्हणजे आम्ही दोघंही सामाजिक गुन्हेगार आहोत आणि इथली गरीबी आणि बेकारी कमी होत नाहीय ती आमच्यामुळंच ! म्हटलं, कसं काय बाबा ? तर त्याचं म्हणणं तुमच्यासारखे साधेपणाचं, कमी गरजांचं स्तोम माजवणारे आणि इथल्या मध्यमवर्गातले -- जो वर्ग आता सुमारे चाळीस कोटी आहे -- कोट्यवधी लोक जे गरजेपेक्षा फारच मोठ्या प्रमाणात बचत करत राहतात ते -- तुमच्यामुळे उत्पादनवाढीची असंख्य कारखान्यांची गरज खुंटते, त्यामुळं नोकऱ्या कमी निर्माण होतात, उद्योगधंदे मर्यादित राहतात आणि बेकारी, गरिबी वाढत राहते ! तुमच्यापेक्षा, तुम्ही ज्यांना चंगळवादी म्हणता ना, ते खरं तर गरिबांसाठी महत्त्वाचे ठरतात ! तो म्हणाला, गरज नसताना एखाद्या कुटुंबात सहासात कार्स आहेत-- त्यांना पार्किंगला जागा कमी पडते म्हणून ते रस्त्यावर पार्किंग करतात -- आता हे अयोग्य असल्यानं तिथल्या पोलिसांना ते महिना हप्ता देतात -- आता पोलिसांनाही ही अवांतर रक्कम मिळाल्यामुळं तेही दिलखुलासपणे ती खर्च करतात -- या सगळ्यामुळे गरजा वाढतात -- उत्पादन वाढतं ! थोडाफार भ्रष्टाचार, थोडाफार काळा पैसाही असणं चांगलं म्हणाला, कारण त्यामुळं खर्चाला जरा हात सैल सुटू शकतात आणि अर्थव्यवस्थेला गती येते ! चीनमध्ये, त्याचं म्हणणं, आर्थिक मंदी यायला लागली तर, पहिला उपाय करतात तो हा की ते लोकांचे पगार वाढवतात ! त्याचं कारण हेच आहे ! तुम्ही साधे राहता याचा अर्थच तुम्हाला गरिबांची फिकीर नाही ! तुम्हाला खरोखर समाजासाठी काही करायचं असेल तर चंगळवादी व्हा म्हणाला ! साधं जगणारी माणसं ही अर्थव्यवस्थेची शत्रू असतात म्हणाला !

नुमान : ( आतूनच -- ) थोडाफार भ्रष्टाचार चांगला म्हणतोय का तो, मग त्याच्यावरचे काही आरोप कमी करायला मी तयार आहे ! ( कौतुकाने ) -- जानन !

नेहा : पपा, याला त्या बारमध्ये अमर्त्य सेन थोडेच भेटले असणार आहेत !

जानन : मी उलट सांगतोय की माझ्यावर हाही एक आरोप होऊ शकतो !

नेहा : थोडक्यात म्हणजे काय, कुणीही, कुणावरही काहीही आरोप करू शकतं -- असं तुला दाखवायचं आहे !

जानन : मला असं जाणवायला लागलंय की आपण वस्तूंच्या अधीन होत चाललोय ! आता वस्तूंचंच अधिराज्य चालेल ! वस्तूंवर अवलंबून राहिलो तर कोणत्या ना कोणत्या वस्तूंच्या अभावाचं दुःख आणि अवलंबून न राहावं तर वस्तूंच्या विरोधात जाण्याचा धोका ! गरिबीचा, गुन्हेगारीचा धोका ! त्या माणसाच्या बोलण्यातलं तथ्य लक्षात घेतलं तर !

नेहा : ( काही क्षणांनी -- ) हं ! ...

जानन : आपल्या कलेच्या प्रसिध्दीसाठी समाजवाद्यांवर अवलंबून राहावं तर खोटेपणा पदरी येतो, त्यांना महत्त्वच न द्यावं तर आपल्याकडे दुर्लक्षच होण्याचा धोका वाढतो ! ( शांतता ... )

नेहा : मला असं लक्षात येतंय की मला तू कवी असण्यात इंटरेस्ट आहे पण तू कवी असण्याच्या प्रोसेसमध्ये मला इंटरेस्ट नाही ! आणि दुसरं म्हणजे ' समाजवादी लोक ' हे काय ' वस्तू ' आहेत? ... ' वस्तू' ?! वस्तूंपाठोपाठ त्यांचा उल्लेख?

जानन : सुखाचं वाटणं -- दुःखाचं वाटणं, उपयोगी किंवा निरुपयोगी वाटणं, हवंसं वाटणं -- नकोसं वाटणं,

उत्साहवर्धक किंवा कंटाळवाणं वाटणं ... कोणत्या ना कोणत्या कारणांनीच घडतं हे सगळं !

नेहा : तुझ्यातले संघर्ष, कलेच्या क्षेत्रात तुला येणारे प्रॉब्लेम्स -- यांत मीच काय, कुणीच इंटरेस्ट घेणार नाही !

जानन : पण त्याच्यातूनच येते ना माझी कविता !

नेहा : ती वाचली जावी, लोकांसमोर ठळकपणे यावी असं वाटत असेल तर यश मिळव -- आणि त्यासाठी तुलाच प्रयत्न करावे लागतील -- साधनशुचिता आणि आपल्या आशयाशी एकनिष्ठ जगणं -- हे विसर ! इथं आता वेळ नाहीय कुणाला ! आणि मी जरा वर्तमानपत्र वाचत बोलणार आहे यापुढे, म्हणजे ऐकणार आहे पण एका वेळी अनेक कामं करावीच लागतील ! ( वर्तमानपत्र वाचू लागते -- )

जानन : जगच बदलावं लागेल मग ! या जगात कविता लिहिण्यात काही अर्थच नाही ! ( शांतता.) एकजण मला म्हणाला की म्हणे सगळं माहीत असलेलं मटेरियलच असतं तुमच्या कवितेत ! म्हटलं बाबा, हो रे, हो ! माहीत नसलेलं मटेरिअल असलेली कविता दाखवशील एखादी? सगळी प्रसारमाध्यमं -- खून, बलात्कार, भ्रष्टाचार, राजकारण, आंतरराष्ट्रीय दबाव -- यांनी रोज आणि मिनिटामिनिटाला इतकी खच्चून व्हरायटी हॅमर करतायत आपल्यावर की अमुक एक आपल्याला माहीत नाही असं कसं वाटू शकेल ? दुसरा एकजण म्हणाला की म्हणे तुम्हाला तुमच्या वाचकांबद्दल सहानुभूती नाही -- आधीच पूर्णपणे वैतागलेल्या वाचकांना तुमची कविता डिस्टर्ब करते ! कविता कशी जरा स्मित करायला लावणारी, ' वाह ! ' म्हणायला लावणारी हवी ! म्हणजे त्याच्याही म्हणण्याप्रमाणे, क्रिमिनलच झाली ना माझी कविता ! तिसऱ्यानं विचारलं की हेतू काय पण तुमच्या कवितेचा? हेतूच नाही? हाऊ कॅन इट बी? त्याला मग मी जरा विचित्रच उत्तर दिलं ! -- म्हटलं सामाजिक, राजकीय प्रश्नांचं जाऊ दे, मूलभूत म्हणवले जाणारे तरी प्रश्न किती असतात? पाचसहाच ! ते आपल्याला माहीतच असतात --दुःख का होतं? बरोबर कृती कोणती? -- वगैरे ! मग ल्याह्यचं काय? नवीन म्हणजे मलाही माहीत नसलेलं असं काहीतरी मला लिहावं लागेल ! तर, या उत्तरानं गोंधळून न जाता तो म्हणाला की सामाजिक, राजकीय अशा परिवर्तनाचा हेतू हवाच ! म्हटलं, वेड्या, हा तर हेतूच सगळा माहीत असलेला झाला, मग मटेरिअल काहीही असो ! ( इथे मधला दरवाजा उघडतो. शोधन येतो.)

शोधन : मी असताना असणारच ही रात्र,
हे आकार, या इमारती, हे दुःख ...
आत्महत्या न करता जिवंत राहिलेला मी
एक दिग्विजयी दुःख
हिंस्त्र.
( जातो. दरवाजा बंद होतो.)

जानन : तर या सगळ्यावर काय तुझं म्हणणं?

नेहा : यश मिळव ! कविता चांगली लिहिली जाणं म्हणजे नेमकं काय हे मला सांगता येणार नाही पण समजा त्यासाठी तुझी खूप तपश्चर्या चालते असं पाहिलं तर त्याच्या पन्नास टक्के तरी कष्ट हे यश मिळवण्यासाठी घ्यायलाच हवेत ! नाहीतर मग हे सगळं कामच कमर्शिअल म्हणूनच करायचं -- गरजच भागवायची लोकांची ! --मग यश आपोआप मिळत जाईल -- कदाचित पैसेही मिळतील ! नावही होईल ! निवड तर आपणच करतो ना ! पण माझं म्हणशील तर मला तुझी आत्ताचीच कविता आवडते ! पण तुलाही यश मिळावं असं वाटतंच !

जानन : शुभेच्छेबद्दल धन्यवाद ! ( जातो. क्षणभराने ती पुन्हा वर्तमानपत्र वाचू लागते. आता, आतापर्यंत न उघडलेला, उजवीकडचा दरवाजा उघडतो. तिथे रिया प्रगटते. स्पॉट. एक पाय दाराच्या चौकटीवर ठेवून एका पायावर उभी. बाकीचे दृश्य अंधारात जाते. नेहा जाते.)

रिया : तशी तरुनपनात येकदा त एंट्री पायजेलच व्हती ! याच्या फुडं मी येकदम पन्नास वर्सांनी येनार ! पगार घ्येतला का येकदोन दीस दांडी मारायची असं त व्हतंच माजं ! पन या डावाला लई दीस जाले ! लई वर्संच जाली ! कारन बी व्हतं तसंच ! मी ठरीवलं का कामच बंद करू ह्ये ! नगच ही रोजची खिटखिट ! यांची नव्हं ओ ! नवऱ्याची माज्या ! आलेच न्हाई हिकडं ! बघा ! ( जाते. इथे हे दृश्य संपते ... **नाटक दोन अंकी केल्यास इथे पहिला अंक संपवावा...** आता सुमारे चाळीस वर्षांनंतरचे दृश्य. समोर एका खुर्चीवर नुमान बसलेले. दुंबर एकीकडे उभा. काही क्षणांनी ...)

दुंबर : नुमान, एक तर तुम्ही आता म्हातारे झालेले आहात आणि शिवाय अर्धांगवायूमुळंही तुमची तशी वाटच

लागलेली आहे... हे सगळं असं नसताना तुम्ही स्वतः खूप सिगरेट ओढत होतात, त्यामुळं तुम्ही मला परवानगी नाकारणार नाही असं गृहीत धरतो ... ( सिगरेट, लायटर काढतो, शिलगावतो, एक झुरका घेतो ... ) तर सांगायचं म्हणजे मी तुमचा जावईही होऊ शकलो असतो ... एका घटनेनंतर माझ्या संवेदनशीलतेला जरा धारच आली आणि नंतर मी नाटकं लिहून लागलो ... कशाला, नाटककारच झालो ! नेहाला कलेची आवड ! पुढे ती स्वतःही कवयित्री झाली ! एकदा ती माझं नाटक बघायला आली होती. म्हणाली, ओळखलंत का? किंचित हसली. मी जरा खजिल होत 'हो' म्हणालो ! आता एवढंच ज्यांनी पाहिलं असेल त्यांना काय वाटू शकतं ते स्पष्ट आहे -- आम्ही पूर्वी कधीतरी एखादी रात्र एकत्र काढली असावी ! तिचं किंचित हसणं आणि माझं जरा खजिल होणं ! ... वा ! कसे शांत बसला आहात ! संताप नाही, हालचाल नाही, आरडाओरडा नाही, मारायला धावणं, शिव्या देणं नाही ! ... शांSSत । माझी आणि तुमची भेट तशी योग्य वेळी होतेय ! पण शांतच राहा, कारण, तसं काही कधी घडलंच नव्हतं ! घडलं होतं ते असं की एकदा तुम्ही माझ्या भावाला संशयावरून पकडून खूप मारलं होतं -- तो निरपराध असून ! त्याचा सूड घ्यायची माझी इच्छा होती ! नेहा आमच्याच कॉलेजात होती. ती एकदा कॉलेजच्या गार्डनमध्ये वाचत बसलेली असताना मी एक मोठा धोंडा उचलून तिच्या डोक्यात घालण्यासाठी गेलो होतो. तिनं माझ्याकडे पाहिलं आणि क्षणभरानं तो धोंडा तिच्या शेजारी टाकून मी निघून गेलो ! ती त्या वेळी बहुधा कविता वाचत होती आणि विशेष म्हणजे मुळीच घाबरली नाही ! त्यामुळंच मी गोंधळलो आणि तो धोंडा शेजारी टाकून निघून गेलो असंच मला वाटत होतं -- निदान पुढे काही दिवस तरी ! पण मग पुढे माझ्या लक्षात आलं की, नाही, मीही संवेदनशील असलो पाहिजे, त्याशिवाय मी गोंधळलोच नसतो ! शिवाय नंतर मला असंही वाटलं की माझी सूडभावनाही फार प्रखर नसावी ! नाहीतर माझ्या संवेदनशीलतेला वाव मिळून मला गोंधळून जाता आलं नसतं ! ... तुम्ही तडफदार असताना मी हे तुम्हाला सांगू तरी शकलो असतो का? विशेष म्हणजे इथं नेहाचाही मोठेपणा मला मान्य करावाच लागेल ! तिनं, त्याच वेळी, ती घटना तुम्हाला सांगितली असती तर? काय काय, किती किती वेगळं झालं असतं याची मी कल्पनाच करू शकत नाही ... एक तर तुमच्या तेव्हाच्या त्या कृतीनं, म्हणजे माझ्या भावाला निष्कारण मारण्याच्या कृतीनं, त्या वेळीं मी खूप भडकलो होतो हे अजूनही तुम्हाला माहीतच नव्हतं -- ते तुम्हाला सांगायची मला इच्छा होती ! काळाच्या ओघात तुमची संवेदनशीलता टोटली बथ्थड झाली असेल असं गृहीत धरलं तरी ! काही घडलंच नाही असं कशाला? कळू दे तरी ! की हो, माझ्या कृतीचे मला माहीत नसलेलेही काही परिणाम कुठे कुठे घडत होते ! कळलं पाहिजे ! मीही आता एक नाटककार असल्यामुळं, इतका वेडाही नाही की यातून फार काही अर्थपूर्ण असं साध्य होणार आहे असं मला वाटावं ! ... नंतर मला नेहा आवडायला लागली होती पण आमच्यात त्या घटनेची दगडी भिंत होती ! त्यामुळं जाननशीच तिचे संबंध वाढत गेले आणि त्याच्याशीच तिचा संसार झाला ! कवीपेक्षा नाटककार कधीही बरा असं तुम्हाला त्या वेळीही पटलं असतं -- म्हणजे असं मला वाटतं ! पण सगळं हे असं झालं ! का झालं ? तर तुमच्यामुळंच ! हेही समजून घ्या ! ... नुसते ओठ हलवताय हो, तुमची कंडिशन बाकी हीच असायला हवी होती पण तुम्हाला नीट बोलता यायला हवं होतं ! ... तुम्ही, आयुष्यभर, संवेदनशीलता गाडून टाकण्याचं महत्त्व सांगत आला असणार ! त्याशिवाय भरपूर यश, भरपूर पैसा, भरपूर सुख मिळणंच शक्य नाही -- असं म्हणत आला असणार ! ... आताही तुम्ही म्हणणारच की हो, अशा, म्हणजे बथ्थड होण्यासारख्या काही गोष्टीही स्वीकाराव्या लागणारच ! डोक्याचा गोंधळ, दुसरं काही नाही ! परवा एक जुने नाटककार म्हणाले, काही चांगली नाटकं टिकत नाहीत आणि काही, लायकी नसलेली नाटकं खूप टिकतात -- असं का घडतं हे कुणीही सांगू शकलेला नाही ! अहो, सरळ आहे ! नाटकाचं सगळ्यांत महत्त्वाचं काम काय असू शकतं याची कवडीची जाणीव नसलेल्या समाजात असंच होणार ! पण गोंधळ ! सगळ्यांत महत्त्वाचं काय असतं नाटकात -- कलेत -- हे न समजणं ! लेखकांनाही आणि प्रेक्षकांनाही ! आणि हा गोंधळ झाकावा कसा? सोपा उपाय आहे ! आपण शोषितांच्या बाजूचे आहोत अशी भूमिका घ्या आणि पुढे चला ! स्वतः गोंधळलेली माणसं ही हलकट असणं, दुष्ट असणं, आत्मकेंद्री आणि क्रूर असणं हे अटळ आहे हे लक्षात येऊनही आपण शोषितांच्या बाजूचे आहोत, न्यायाच्या बाजूचे आहोत अशी भूमिका घेता येते? गोंधळलेल्या, वेडपट समाजात हे चालू शकतं, मग तो कितीही सुसंस्कृत समाज म्हणून प्रसिध्द असो ! ... मला खूप आनंद आहे की, तुमचे डोळे उघडे आहेत ... त्यामुळं, कानही उघडेच असतील असं मी

समजू शकतो ! ... मला पडला होता प्रश्न ! मीही जर कधीतरी सूडभावनेनं हिंसेला प्रवृत्त होतो तर बोंबलायला मी लिहिणार काय?! तेच मघाचे नाटककार भेटले होते. ते म्हणाले, आजचे प्रश्न खूपच अधिक जटिल आहेत, तुम्ही संवेदनशील असून शिवाय हुशार आहात तर या आजच्या जटिलतेचीच नाटकं लिहा ! बोंबला ! आणि या असल्याच सगळ्या गोष्टी हॅमर होत राहिल्यामुळं शेवटी सारांश काय निघतो? -- तर कलेचं मुख्य काम ' करमणूक ' हेच । गोंधळाच्या आजच्या वेगळेपणात गुंतवून टाईम पास ! गोंधळाचा वेगळेपणा दाखवणारे प्रायोगिक आणि गोंधळ टाळून हसू-रडू देणारे व्यावसायिक ! त्यातही श्रेष्ठ कोण? तर शोषण आणि अन्याय आणि विषमता यांच्या विरोधात भूमिका घेणारे ! ... ठरवूनच टाकायचं सगळं ! डेड करून टाकायचं ! बोअरिंग करून टाकायचं ! तुमचं तसंच आहे ! भाबडेपणा नको, आपल्याला कुणी पायजमा म्हणता कामा नये, जास्तीत जास्त लोकांची मारून टेचात जगता आलं पाहिजे ! ठरलं की ठरलं ! मराठी माणूस पुढे गेला पाहिजे !... पण मला हे प्रश्न पडले ! कळले असं नाही ! पण मी ते टाळले नाहीत ! गोंधळात जगणाऱ्या माणसाला अमुक एका गोष्टीत क्लॅरिटी असू शकते का -- असा प्रश्न मी टाळला नाही ! मुळात शोषित हा प्रकारच तर या गोंधळामुळंच अस्तित्वात येत नसेल? -- हाही प्रश्न टाळायचा नाही असं मी ठरवलं ! मुळात नाटकाचा या प्रश्नांशी काही संबंध असतो याची शून्य जाणीव असणाऱ्या समाजात मी टाळला जाणं हेच घडणार होतं, कारण गोंधळ हीच एक काहीतरी महत्त्वाची गोष्ट आहे असं गृहीत धरायला मी नकार दिला ! त्या त्या पिढीचे कलाकार म्हणजे त्या त्या पिढीच्या गोंधळाला समर्थपणे व्यक्त करणारे लोक असं मान्य करण्यात मला एकूणच कलेचं क्षेत्रच क्षुद्र झाल्यासारखं वाटत होतं ! ... मग काय ? आणखी काय? -- हे प्रश्न होते ! कहर म्हणजे एकजण तर मला म्हणाला की गोंधळ नाही, अन्याय नाही, क्रूरपणा नाही, हिंसा नाही, अपमान नाही, दुःख नाही --- असलं जगणं अत्यंत डल आणि कंटाळवाणं होईल ! वुई मस्ट हॅव ऑल धिस ! जगणं हे इंटरेस्टिंग असायलाच पाहिजे ! कुरघोडी करणं, पीडा देणं, डावपेच करणं, जिंकणं - हरणं, उद्दाम असणं, प्रेमळ असणं, कुणाची तरी काळजी घेणं आणि कुणाला तरी देशोधडीला लावणं, आयुष्यातून उठवणं -- हे सगळं असल्याशिवाय लाईफ इंटरेस्टिंग कसं होईल? हे सगळं वगळलं तर, शिल्लक काय राहतं ते सांगा ना ! नथिंग ! बोअरिंग होईल सगळं ! पण, बोंबलायला शोषणाविरुध्द भूमिका हवीच ! हे सगळं हवं पण शोषण नको ! -- मी हे सगळं एकत्रितपणे पाहायचा प्रयत्न केला म्हणून मी नाकारला गेलो असं होऊ नये म्हणून काही तांत्रिक कारणं शोधली गेली आणि हायलाईट केली गेली ! असं होऊ नये म्हणून मी काय करायला हवं होतं? मला हे सगळं एकत्रितपणे पाहायची गरज वाटत होती तर ती दडपून टाकायला हवी होती? मला जे महत्त्वाचं वाटतं त्याला महत्त्व देऊ की मी नाटककार म्हणून स्वीकारला जाण्याला -- मोठा मानला जाण्याला महत्त्व देऊ? -- हे असले प्रश्न फक्त नाटकातच नसतात रे च्युत्तड, जगण्यातही असतात ! या सगळ्या बाबतीतल्या टाळाटाळीला बहुसंख्यांप्रमाणे तूही पाठिंबा दिलास ! टाळाटाळीला उपयोगी पडणारं जे जे -- तो सगळा टाईमपास ! कलाच काय लाईफच .. नंतर काळाच्या ओघात आम्ही मोठे झालो ... वयानं... मी आणि माझा भाऊ ... तू ज्याला मारलं होतंस तो ! तरुणपणातली आसक्ती काही पुढं टिकली नाही... ( शोधन येतो.)

शोधन : सायंकाळ व्हावी
आणि तिच्या होण्या - न होण्याशी
असावा आपला संबंध.
आता लौकरच होईल मुक्तता ...
( मोठा शांत पॉज ...)
माझे आयुष्य
सायंकाळही उलटलेली वस्तू.
( मोठा शांत पॉज ... )
... होते सारे आयुष्यच
अर्थविव्हल ... ( शोधन जातो.)

दुंबर : अर्थाचा शोध ... आणि अर्थविव्हल असणं ... तुमच्या नोकरीला आवश्यक म्हणून तुमच्या मेंदूचं जे केलं गेलं, तिथं मला कसं पोचता येणार ? पण आम्हीही तसे प्रयत्न करत आलोच ! बथ्थड होण्याचे !

वैफल्यग्रस्त होऊन ! कुत्सित होऊन ! आपण दोघंही दोषी नाही ... तसं तर कुणालाच दोषी मानता येणार नाही ... ( इथे हे दृश्य संपते. पुढचे दृश्य आणखी सुमारे पंधरा वर्षांनंतरचे. नेहा आता सत्तरच्या पुढे. खुर्चीवर बसलेली. आपल्याच विचारात... शोधन येतो ... )

शोधन : हे नसते दुःख,
हा नसतो शाप,
ही नसते क्रूर नियतीही;
कारण
याखेरीजचे माझे आयुष्य
होऊच शकणार नसते
माझ आयुष्य.
संघर्षांचे उद्‌गम आकार
माझ्या बाहेरचे
होतात मीच ...

( तो जातो. नेहा बसून ... काही क्षणांनी रिया येते. नेहाचे लक्ष नाही. रिया तिच्याकडे पाहात उभी ...)

नेहा : कली ऽ ए, कली ऽ ( छोटी कुत्री जवळ आल्याप्रमाणे -- ) आली गं बाई माझी बबडी -- हो ऽ देते, देते ... ( तिला बिस्किटे खाऊ घालते.)

रिया : ताई ऽ ( नेहा बघते -- ) वळकलं का? मला ?

नेहा : ( बारकाईने बघत -- ) रिया ना तू -- अग्गोबाई -- ही फारच मोठी दांडी झाली गं तुझी -- पूर्वी पगार झाल्यावर दोनतीन दिवस असायची -- ही म्हणजे खूप वर्षं झाली गं ! --

रिया : कामाला न्हाई आले -- भेटाया आले -- तुमी हितं ऱ्हाता कळलं --

नेहा : हं, हं -- ये, ये -- बस !

रिया : टिकली वाटतं !

नेहा : तेव्हाची? नाही गं ! ती वारली ! तिच्या कपाळावर काळी टिकली होती म्हणून आपण तिला टिकली म्हणायचो ! ती गेल्यावर फारच अस्वस्थ झालो आम्ही -- विशेषतः मी ! म्हटलं आता पुन्हा आणायची तर तीच -- तशीच आणायची ! कपाळावर टिकली असलेली ! पण किती तरी वर्षं सापडलीच नाही तशी ! आणि मग सापडली शेवटी ! ती ही ! पण हिलाही टिकलीच म्हणावं तर हिला आयडेंटिटी क्रायसिस यायचा ! म्हणून हिचं नाव ठेवलं कली ! व्हिन्सेंट व्हॅन गॉ नावाचा चित्रकार होता -- त्याचा मोठा भाऊ व्हिन्सेंट वारल्यावर हा झाला. -- आईवडिलांना व्हिन्सेंट फार आवडायचा, म्हणून, याचं नाव तेच ठेवलं -- व्हिन्सेंट ! तर याला झालाच तो -- आयडेंटिटी क्रायसिस ! मग मी कोण आहे? हे तर माझ्यात त्यालाच पाहतायत ! मग मी कोण आहे? त्यानं काही सिल्फपोर्ट्रेटस काढलीयत म्हणे -- तर एकातही त्याचा चेहरा स्वतःसारखा नाही -- कधी आईसारखा -- कधी बापासारखा -- असं झालं ! आता हाच का तो चित्रकार हे मला नक्की आठवत नाहीय -- हा आणखी एक आयडेंटिटी क्रायासिस आहेच ! कारण साल्वादोर डालीलाही त्याच्या मृत भावाचं 'साल्वादोर ' हे नाव ठेवलं गेलं होतं असं मला वाटतंय ! अर्थात हा माझ्यातला क्रायसिस त्याला माहीत व्हायची शक्यता नाही ! हे एक बरं आहे ! हाल झाले असते नाहीतर ! त्याचे ! ... आणि एवढं करून, ती चित्र काढून अमर कोण झाला हे कधीच कुणालाच कळणार नाही !

रिया : मंजे ?

नेहा : म्हणून हिचं नाव 'कली ' ठेवलं !

रिया : म्हंजे आता ही बी गेली तं फुडचीला निसतं 'ली' म्हनायचं ! आन ती बी ग्येली तं काय न्हायी ! नावच ऱ्हानार न्हाई !

नेहा : अगं त्या वेळी बघू -- दुसरं नवीनच काढू काहीतरी ! त्याच्या आधी आता आमचंच आयुष्य किती जातंय पुढं तेही बघू --

रिया : बरं, काय काय जालं -- सांगा की समदं -- नुमान सायेब --

नेहा : पपा वारले ! वय झालं, पॅरॅलिसिस झाला, वारले ! त्याच्या आधी अर्थातच माझं आणि जाननचं लग्न झालं होतं -- ते तुला माहीतच आहे -- आम्ही एकत्र राहात होतो तेव्हा होतीसच की तू -- तो कवी

असल्यामुळं पपांना तो आवडत नव्हता -- पण तो इंजिनियर म्हणूनही चांगलं जगतो हे लक्षात आल्यावर जुळवून घेतलं त्यांनी -- आम्हाला एक मुलगा झाला, तोही इंजिनियर झाला -- अमेरिकेत आहे -- इथं आम्ही दोघंच असतो -- जानन आणि मी -- आणि अर्थातच ही कली -- पण तू एकदम इतक्या वर्षांची दांडी का मारलीस गं? अं?

रिया : सांगत्ये की -- मला नगंच व्हती कटकट --

नेहा : काय कटकट होती गं आमची?

रिया : तुमची न्हवं -- नवऱ्याची माज्या --

नेहा : त्याची ?

रियाः अवो, तो व्हता एका कालेजच्या प्रिन्सिपालच्या गाडीवर डायव्हर -- तं त्यांची -- परफेसरांची कायबाय बोलनी ऐकायचा त्यो --

नेहा : अगं --

रिया : ऐका तं -- तं यकदा कुनीतरी म्हनलं का म्हनं कवी लोक बाकीच्या लोकांपरीस जास्त जगत्यात -- म्हंजे जास्त वर्सं न्हवं -- आपुन येक मिनिटात येकच मिनिटाचं जगतो का न्हाई तं कवी म्हनं येका मिनिटात धा मिनिटांचं जगतो ! मन लई गरम असतं म्हनं कवीचं !

नेहा : जास्त संवेदनशील असल्यामुळं कवी अधिक तीव्रतेनं -- असोशीनं -- आसुसून जगतो असं म्हणायचं असेल त्यांना !

रिया : व्हय -- असंच ! तं तुमचे जाननसाहेब कवी व्हते -- म्हंजे असतील अजूनबी --

नेहा : बरं मग ?

रिया : माजा नवरा डाऊट खायचा ! इकडनं उशीर झाला का म्हनायचा -- काय जास्त जगती काय? दर येळी ह्येच !

नेहा : काय गं हे डोकं !

रिया : आरं म्हनलं त्यो केवडा, तू केवडा, -- त्याची ताकत, तुझी ताकत ! इचार कर जरा ! माज्या मानानं काय तरी पायजे का न्हाई ! तं म्हनायचा ताकतीचं सोड, गरजेला हुबी ऱ्हाती ताकत पायजेल तेवडी ! आन मंग येकदा जास्त जगायची चटक लागली का लागली !

नेहा : माझं तर डोकंच काम करत नाहीय !

रिया : माजं बी तसंच जालं ! म्हनलं, जाऊं दे, नगंच ही कटकट ! म्हनून येनंच बंद क्येलं तुमच्याकडं ! आन काम का सोडलं त्ये यून सांगू काय !?

नेहा : चांगलं केलंस बाई ! पण बरं झालं बाई, कळलं तरी ! मरायच्या आधी उलगडा तरी झाला ! त्याच्याच ओळी आहेत --

वस्तूचा खरेपणा अनिवार<br>
वस्तूला.<br>
मनाचे सारेच व्यवहार<br>
मनाला.

त्यामुळंच, तू अशी भेटणं, सगळा उलगडा होणं -- हे सगळं महत्त्वाचं ठरतं गं !

रिया : ज्या कवितेपाई मला काम सोडून जावं लागलं ती कविता मला काय बी समजनार नाय ! ह्ये मला लई वंगाळ वाटतं !

नेहा : पण ठीक आहे, थांब आता आलीयस तशी ! तुझ्या ताकदीचा उपयोगही होईल !

रिया : म्हंजी?

नेहा : ते खोकं बघितलंस ना -- ते उचलावं लागणार आहे ! बरं, ते सांगते नंतर, मला आधी सांग, आम्ही इथं राह्यला आलोय हे तुला कळलं कसं ?

रिया : योगायोगच म्हनायचा ! हितं, पलीकडं दुंबरसायेब ऱ्हात्यात -- नाटकं लिवनारे ! त्यांच्या मुलाला आमची मुलगी दिलीय ! दिलीय कसली, घेतलीच त्यानं ! कवी हाय त्यो ! शिक्षन, पैसा -- सगळ्या बाबतीत यवढा फरक त्यांच्यात आन आमच्यात ! पन त्येचं म्हननं सगळं जुळनाऱ्यांनी लग्नं करावी, ही जुनी पध्दत जाली ! त्येला ह्ये असं येगळं करायचं हुतं ! म्हनलं बाबा, ह्ये बी फार येगळं न्हाई ... आमच्या ल्हानपनच्या हिंदी पिक्चरमंदी असंच व्हत व्हतं ! पन, म्हनलं, ठीक हाय, कर येवडं येगळं, पन बाकी

फुडं काय येगळं नसतं बाबा ! त्यवडं चालवून घ्ये म्हंजी झालं !

नेहा : अच्छा, तर तिथं कळलं तुला ! आमच्याबद्दल !

रिया : व्हय, त्यांच्यातच इषय चालतावता त्यो म्या ऐकला ! आरं म्हनलं ही तर नेहाताईच असंल !

नेहा : तुझ्या नवऱ्याला बरा चालला कवी जावई !?

रिया : असू दे म्हनला ! त्येच्या बरूबर आपली पोरगी बी जरा जास्त जगंल म्हनला ! पर काय वो, मला येक सांगा, तुमचे जाननसायेब बी कवीच हायेत की ! तुमी बी जगला का जास्त?

नेहा : मला नाही बाई असं वाटत ! पण त्याचं कारण मला असं वाटतं की पुढं पुढं मीच जरा कविता ल्याह्यला लागले !

रिया : मग तर डब्बल जालं की वो ! जास्तच जास्त !

नेहा : नाही, माझ्या कविता म्हणजे, स्वप्न, डोह, चंद्र, पायवाट, लाट, कान्हा आणि राधा -- अशी सतत तो माझी टिंगलच करत आला ! त्यामुळं त्याचं न् माझं दोघांचंही डब्बलच्या ऐवजी एकचतुर्थांशच झालं !

रिया : आस्सं ! बरं, मुलगा तुमचा, त्यो बी लिवत आसंल !

नेहा : छे, छे ! तिहिणाऱ्यांची तिडिक आहे त्याला ! तिटकाराच म्हण ! विशेषत : मराठीतल्या लिहिणाऱ्यांना, आपल्याला लाईफ फार समजतं असा दर्पच असतो असं त्याचं म्हणणं ! म्हणजे गंभीर लिहिणाऱ्यांचं हे असं । आणि करमणूक -- मराठीतली करमणूक तर अत्यंत दरिद्री आणि केविलवाणी असते असं म्हणतो तो !

रिया : आपल्या भाषेचा अभिमानच न्हाई म्हंजे ! आनी आईबाबांचा तरी ?

नेहा : जाननबद्दल त्याला आदर आहे ! पण त्याचं म्हणणं इथं सीरीयसली काही करण्यातच अर्थ नाही ! सांस्कृतिकदृष्ट्या महाराष्ट्र इज आलरेडी डेड ! इथं संस्कृती म्हणजे फक्त विविधगुणदर्शन ! इथली अर्थपूर्ण निर्मिती थांबलेलीच आहे असं त्याचं म्हणणं ! सगळे फुटकळ आहेत ! बक्षिसांत धन्यता मानणारे ! कुठंतरी कुणीतरी आपल्यावर लेख लिहिले की आपण 'पोचलेलो' आहोत असं समजणारे ! किरकोळ सगळे ! नो मॅच्युरिटी !

रिया : त्यो स्वोता बी इचार करतो का काय येवडा ! न लिवता ! का ऐकून ऐकून निसतं?

नेहा : दोन्ही थोडं थोडं खरं आहे ! जानन आणि त्याचा एक मित्र यांच्या बोलण्यात असतं असंच काहीकाही ! पण हा तेवढंच बोलत नाही ! त्यांच्याहून खूपच जास्त वाईट बोलतो !

रिया : आता आपला जावईच कवी हाय म्हनून मी जात्ये कंदीकंदी त्येंच्या कारेक्रमांना -- तं थितं येकजन म्हनले का गरिबाची बाजू घ्याया हवी -- अन्याव नगो -- समदे सारके जाले पायजे ! -- यासाठी लिवतो त्योच खरा म्हनले ! मला बी पटलंच त्ये ! काय चूक हाय ह्यात? आन ह्ये समजनारेच लिवनारे असल्यावं काय वाईट हाय?

नेहा : मला जाननच्या कविता आवडताताच पण मी तर पायवाट आणि लाट ! मी काय बोलू?

रिया : बरं, त्या खोक्याचं काय म्हनला? काय हाय त्यात? कुटं न्यायचं?

नेहा : आता जानन येईल. तो आल्यावर करायचंय ते काम. वेळ असला तर थांब जरा !

रिया : हाय की ! येळाचं काय यवडं !

नेहा : माणसाचं कसं होतं -- वाढत्या वयाबरोबर? तसंच ! केस पिकणं, दात-दाढा काढल्या जाणं, गुढगे दुखणं, एखादं ऑपरेशन -- असं होत होत शेवटी समाप्त ! तसंच त्याला कवितांचं झालं असं वाटतं ! म्हणजे आता आपली कुणाला गरज नाहीय हे कळणं आणि जगण्याचे एकेक खांब पडत जाणं आणि समाप्तीला तयार होणं ! एखाद्या सर्वसामान्य माणसासारखंच कवितेचं -- कलेचं आयुष्य असणं ! काही माणसांच्या संपर्कात येणं, काही साजरं करणं आणि गडप होणं ! निरनिराळ्या वस्तू कशा त्या त्या वेळच्या गरजा भागवतात -- तसंच !

रिया : क्षनभंगुर वो !

नेहा : त्याहून वाईट ! वाईट,रटाळ, कंटाळवाणं आणि काय म्हणूं -- निरर्थक ! शक्ती आणि वेळ वाया घालवणं ! ' सडणं ' हा शब्द योग्य आहे ! म्हणजे हातसडीचे तांदूळ, त्यातलं सडणं नव्हे -- ' कुजणं ' या अर्थी !

होऊ शकणार नाही कधीच
तीच रचना दुसऱ्या कोणाचीच.

या रात्रीची ही रचना
ही माझी रचना ... मीच ...
-- माझं सडणं -- कुजणं वेगळं आहे हाच अभिमान ! मला तर आता वेगळ्याच कविता लिहाव्यात असं वाटतं ! पण, लक्षात येतं -- कशाला ? त्याच लिहिल्या काय आणि वेगळ्या लिहिल्या काय?! या चार लोकांनी वाचण्याऐवजी ते चार लोक वाचतील ! तेही कदाचित आपण संग्रह सप्रेम भेट दिले, वाचा म्हणून फोन केले तर ! जाणकारांची ही अवस्था ! आम्हाला दोघांनाही खरंच असं वाटतं की मराठीतली हजारो पुस्तकं देशोधडीला लागली आहेत ! फिनिश्ड ! ... त्यानं आधीच खूप पुस्तकं, नोटस वगैरे कुणाला देणं नाहीतर रद्दीत घालणं असं करून बरंचसं संपवलंच होतं -- या खोक्यात मुख्यतः त्याची स्वतःची पुस्तकं, हस्तलिखितं, त्याची अत्यंत आवडती पुस्तकं -- असं निवडक सामान आहे !

रिया : कुटं न्यायचं ह्ये?

नेहा : विसर्जन करायचंय याचं ! आणि करायचंच आहे तर एखाद्या डबक्यात कशाला, थेट समुद्रातच करावं असा त्याचा विचार आहे ! ( जानन येतो.) कोण आलंय, ओळखलंस का?

जानन : नाही, सॉरी --

नेहा : ही रिया, पूर्वी आपल्याकडे कामाला होती --

जानन : हां, हां, आठवलं --

नेहा : काय ठरलं मग ?

जानन : पोलीस म्हणतात, लॉंचमधून हे असं खोकं जर तुम्ही समुद्रात टाकलंत तर आम्ही तुम्हाला अटक करू !

नेहा : आधी तपासा की म्हणावं -- त्यात काही संशयास्पद नसल्याची खात्री करून घ्या !

जानन : ते तर करणारच म्हणतायत पण किमान पंचवीस हजारांची तोड होईल ! प्रत्येक खेपेला एकेक पुस्तक टाकलं तर चालेल म्हणतायत ! ते मला कमी खर्चात पडेल ! जरा खेपा वाढतील एवढंच ! एका खेपेत जर जास्त काही घाण टाकली समुद्रात तर आम्ही कदापी सहन करणार नाही म्हणाले ! मग पर्यावरण संरक्षण कायदा लागेल म्हणाले !

रिया : मी सांगू का -- कशाला येवडं करत बसताय? घराच्या मागं न्या आन लावा काडी ! अग्निदेव बी मोट्टाच असतोय न्हवं?!

जानन : माझा एक मित्र म्हणाला की हा एक नुसता प्रसिध्दीचा स्टंट आहे असा माझ्यावर आरोप होईल ! कारण, प्रसिध्द झालेलं लेखन उपलब्ध असणारच आहे ना बाहेर ! आणि तरीही कुणी काही वाचण्याची शक्यता नाहीच म्हणला ! म्हटलं बाबा हो, हे एक प्रतीकात्मक विसर्जन आहे ! आणि माझ्या कवितांचं काय होणार आहे याची मी कधी पर्वा केली नाही तर माझ्या या कविताबाह्य कृतीचा अर्थ काय लावला जाईल याचा मी कशाला विचार करू? आणि कविता समजून घेण्यापेक्षा अशा बाहेरच्याच एखाद्या कृतीचा अर्थ लावण्यातच सगळ्यांना इंटरेस्ट आहे हेही दिसू दे ना !

नेहा : कुणाला? कुणाला दिसू दे ? बघणारे हेच आहेत ! मला रियाचंच पटतंय ! आपल्या घरामागच्या टेकडीवर जाऊ -- जरा उंचावर जाऊन काडी लावू ! माझ्याही लाटा आणि पायवाटा टाकू त्यात !

रिया : त्यापरीस असूं द्या की म्हंते मी ! घाई कशाला ! शेवटाला व्हायचं ते व्हईल !

जानन : एवढं करून, टाकलंच तुम्ही ते खोकं समुद्रात तर अटक तर करूच म्हणाले तुम्हाला, शिवाय समुद्रातनं ते खोकं बाहेर काढून त्याचा पंचनामा करू आणि मग आमच्या पध्दतीनं ते आम्ही निकामी करू म्हणाले ते !

नेहा : म्हणजे काय बॉम्ब आहे का काय तो ?

जानन : अगं, समज आहे बॉम्ब, पण कुणाची वाचनाची ज्योत पेटली तरच ना ! आणि आणखीही एक म्हणाले ते की म्हणे तुम्ही जर टाकलंच असं खोकं समुद्रात तर आम्ही आरडीएक्स भरलेलं दुसरंच खोकं समुद्रात टाकून ते खोकं काढू बाहेर समुद्रातनं आणि तुमची वाट लावू ! तुमचं मूळ खोकं बाहेर काढून तुमचा खरेपणा सिध्द करणं हे तर तुम्हाला जमणंच शक्य नाही म्हणाले !

नेहा : तू असा फ्रस्ट्रेट होऊ नकोस !

जानन : मी फ्रस्ट्रेट होतोय असं तू म्हणणं हेच एक ते खरं असण्याची शक्यता तयार करतं नं ! माझ्या मनाची स्थिती तुला कळणं शक्य आहे का? मग ती अमुक आहे असं म्हणण्यात तू का इंटरेस्ट घेतेयस?

नेहा : ( चिडून --) कशाचंच काहीच कळणं शक्य नसेल तर कवितेतून तरी काय अभिव्यक्त करतो आपण?

कुणासाठी? काय कळण्यासाठी?

जानन : मी फ्रस्ट्रेट होणारा, हसणारा, रडणारा, पोरकट, मॅच्युअर -- सगळाच आहे -- आणि माझं हे सगळं, टाळाटाळ न करता पाहणाराही !

नेहा : येस ! आय नो ! ... थांब हं रिया, चहा करते !

रिया : कॅन्सल ठरलं न्हवं समुद्राचं ! मी जात्ये ! आता नगं ! पुन्ना यीन ! जाऊ ?

नेहा : हं --

रिया : जात्ये हां सायेब --

जानन : हं -- ( ती जाते. काही क्षण. मग -- )

नेहा : वातावरणच असं आहे की कधीकधी मलाही उपरोधिक व्हावंसं वाटतं ! ( त्याच्याजवळ जाऊन, खांद्यावर हात ठेवून -- ) आणखी लिही एखादी कविता ! बरं वाटेल ! ... ( इथे हे दृश्य संपते. पुढल्या दृश्यात तीन खुर्च्यांवर नुमान, रिया आणि शोधन बसलेले. शोधनचे कपडे जुने, फाटके, केसही पिकलेले. नुमान आणि रिया वय वाढले असले तरी आपापल्या टेचात. तिघेही जवळजवळ निश्चल बसून. शोधनच्या हातात पुस्तक. वाचतोय. एखादे पान उलटणे, बसण्याची पोझिशन बदलणे -- अशा फक्त हालचाली. नुमान पिस्तूल आणि काठी यांच्याशी चाळे करत. रियाचे केस विंचरणे. एका बाजूला आणखी तीन खुर्च्या आहेत. शोधन पुढे येतो. पुस्तकातूनच वाचतो ... )

शोधन : दिसू लागला आहे आता मला चंद्र
काही क्षण
विचारच स्थगित झालेली ही वस्तू !
( पॉज.)
... उलटलेल्या सायंकाळचे
भयही दुःखात समाविष्ट झालेली वस्तू
ही रात्र !
( पॉज. )
माझे आयुष्य
सायंकाळही उलटलेली वस्तू...
( पॉज. )
... होते सारे आयुष्यच
अर्थविव्हल ...
( पॉज. )
वस्तूचा खरेपणा अनिवार
वस्तूला.
मनाचे सारेच व्यवहार
मनाला.
( मागे जाऊन जागेवर बसतो. वाचत राहातो. या दरम्यान जानन, नेहा येतात.)

जानन : आपण आहोत तोपर्यंत आपल्याला योग्य वाटेल ते करत राहूच.

नेहा : निघेल काहीतरी मार्ग. दुंबर येतोच आहे. तो जरा आक्रमकही आहे आणि नाटककारही.

जानन : म्हाजे कवीपेक्षा नाटककार --

नेहा : तसं काही नाही -- ( दुंबर येतो.)

दुंबर : मला उशीर तर नाही ना झाला?

नेहा : नाही, आम्हीच लौकर आलो जरा !

दुंबर : ठीक आहे, पटकन विषयाकडे जाऊ. वस्तुतः तुमचे न् माझे इंटरेस्ट वेगळेच असण्याची शक्यता आहे, पण, नेहा आणि मी एका कॉलेजात होतो हा एक धागा आहेच ! शिवाय काही कॉमन निघतं का ते तर पाहू ! तर ज्ञानपीठापासून सुरुवात करू. लोकप्रिय असणं, गरीबांचा कळवळा, थोडं उदात्त वाटायला लावणं, आणि आपण एक खास असे दर्जेदार रसिक आहोत असं वाटायला लावणं ! --एवढं याला आवश्यक असतं असं म्हणू ! वाचणाऱ्यांमध्ये बऱ्याच जणांची अशी गरज होती असा एक काळ होता !

त्यानंतरचा सामाजिक बांधिलकीचा म्हणा किंवा परिवर्तनवादाचा म्हणा किंवा विद्रोहाचा म्हणा -- असा एक काळ मधे आहे, त्यामुळं, आणखी एखादं ज्ञानपीठ मराठीला येऊ शकेल ! त्यानंतर मात्र इथे ते द्यायची आवश्यकता राहणार नाही. कारण नंतर गरजा बदललेला कालखंड सुरू होतो. नाहीतर मग ज्ञानपीठाचे निकषच बदलावे लागतील !

जानन : समाजाचा जो सांस्कृतिक दर्जा असतो त्याहून जास्त उंचीची कलाकृती त्या समाजात निर्माण होऊ शकत नाही -- असं आपल्याकडचेच एकजण म्हणालेलेच आहेत !

नेहा : थोडक्यात म्हणजे कलाकार हे समाजाच्या गरजा भागवत असतात !

दुंबर : तर प्रॉब्लेम असा आहे की कुणाच्याही गरजा भागवण्यासाठी आपण लिहितो असं आपण मानत नाही -- हे आपलं कॉमन आहे ! पण त्यामुळंच, मान्यता मिळणं, लोकांचं नीट लक्ष जाणं, कामाचं योग्य मूल्यमान होणं यांत आपण मागे पडतो !

जानन : लिहिताना आपली काहीही भूमिका असो, जे आहे ते नुसतं पडून राह्यला नको असेल तर मार्केटिंग करावं लागणार असंच दिसतंय !

नेहा : हेही आपणच करायचं?

दुंबर : होय. मी साधारण खर्च सांगतो. किमान तीन ठिकाणी लेख छापून आणणं -- पंधरा हजार, किमान तीन ठिकाणी चर्चा आयोजित करणं -- एकवीस हजार, पारितोषिकांसाठी लक्ष ठेवून सगळीकडे एण्ट्रीज पाठवणं -- दहा हजार आणि इतर खर्च सुमारे पंधरा हजार ! एकूण एकसष्ट हजार होतात ! हे म्हणजे एखाद्या जाहिरात कंपनीलाच द्यायचं काम असं ठरवून मी हा अंदाजे खर्च काढला आहे ! साहित्याची थोडीफार जाण असलेले माझे दोन मित्रच अशी एक जाहिरात फर्म काढायच्या विचारात आहेत ! आयुष्यभर केलेल्या मेहनतीसाठी थोडाफार खर्च ठीक आहे ! शिवाय काही पारितोषिकं मिळालीच -- रक्कमेसह म्हणतोय मी -- तर तो खर्च तेवढा वजा होईल !

नेहा : पण लोकांच्या गरजेप्रमाणे कुठं असणार आहे आपलं लेखन ?

दुंबर : ( हसून -- ) अशा वेळी, आपण जे करतोय तीच त्यांची गरज आहे असं त्यांना पटवून द्यायचं ! हेच तर असणार आहे यातलं कौशल्य !

नेहा : तसं आपलं आपण विचार केल्यावर मलाही एक गोष्ट पटते -- उपयोग असा काही नसतो आपल्या लेखनाचा ! आता तसं पाहिलं तर आजच्या काळाची मुख्य वैशिष्ट्यं काय? खूप खरेदी करायची आवड, हाव म्हणण्यापेक्षा हावरटपणा, आणि हे सगळं नीट पूर्ण होत नसल्यामुळं येणारा अस्वस्थपणा किंवा दुःख ! या गोष्टींना एखाद्या कवितेचा काय उपयोग असणार आहे?

दुंबर : तुमच्या वर्णनात थोडी अपूर्णता राहिलीय ! मनाच्या काही आवडत्या हालचाली वारंवार होत राहण्याची आवड ! -- हे राहिलं होतं ! त्या मिळू शकतात कलेतून ! संगीतातून, कवितेतून, नाटकातून ! हे फार महत्त्वाचं आहे !

नेहा : म्हणजे त्या हालचाली ओळखून आपण त्या जाग्या होतील -- मन तशा हालचालींना उद्युक्त होईल असं ल्याह्यचं !

दुंबर : आपण, दुसऱ्यांनी वाचावं, पाहावं म्हणून लिहितो की नाही -- की घरी पाडून ठेवण्यासाठी लिहितो? एवढी एक तडजोड करावीच लागणार ! लिहिताना नाही केली तरी नंतर तरी असं भासवावं लागणार की ते तसं आहे !

जानन : खड्ड्यात गेलं सगळं ! ही म्हणाली म्हणून आणि थोडंसं मलाही पटत होतं म्हणून मी आलो पण आता येतंय लक्षात -- मला यात इंटरेस्ट नाही ! मी चाललो ! नेहा, तुला यायचं असलं तर चल, मी बाहेर वाट पाहतोय ! ( जातो. काही क्षण.)

दुंबर : ठीक आहे, असंही घडणारच ! मी तरी काय सगळं आवडून बोलतोय थोडंच ! ... बरं, इथं वय लक्षात न घेता एका चुंबनदृश्याची गरज आहे, असं नाही तुम्हाला वाटत?

नेहा : ( मानेला झटका देत -- ) हुं ! ! ( जाते.)

दुंबर : मीच काढणार आहे अशी जाहिरात फर्म ! कारण ती आजची गरज आहे ! आला, प्रश्न आला लक्षात ! पहिलं गिऱ्हाईक ? -- मीच ! इथं थोडं हसण्याची गरज आहे म्हणून हसतो -- ( हसतो.) आणि जातो. ( जातो. दृश्य संपण्यासाठी प्रकाश कमी कमी होत असताना जानन, नेहा, दुंबर पुन्हा प्रवेश करतात. प्रकाश पूर्ववत. आता बसलेले तिघेही उठून उभे राहतात. एकमेकांचे हात धरून गोल करतात. गोल

फिरत पुढील ओळी... जानन आधी म्हणतो, मग सगळे, याप्रमाणे ...)

जानन : हे प्रिये अर्थहीनते,

सगळे : हे प्रिये अर्थहीनते,

जानन : तुलामला सर्व टाकू इच्छितात

सगळे : तुलामला सर्व टाकू इच्छितात

जानन: वाळीत

सगळे : वाळीत

जानन : अन् धजतात

सगळे : अन् धजतात ...

( आता फक्त जानन ... )

जानन : हे माझ्या अर्थहीन प्रिये
करत राहा माझ्यातले सदोदित
सर्व अर्थ नष्ट
अन्
माझ्या म्हणजे सर्वांच्या
सर्व अर्थांच्या सर्व मर्यादा
संपोत
तुझ्या निर्योन संपूर्णतेत ... ( 'निर्योन' शब्दाऐवजी 'निरपेक्ष' किंवा 'वासनीहीन 'चालेल.)

( पडदा पडत जातो ... )

--- समाप्त ---

चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा. चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पुणे ४११००९.
टेलिफोन - (०२०) २४२२७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.

Website : champralekhan.com